**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या आस्थापनेवर मंजुर असलेल्या गट-ड संवर्गातील पदांपैकी २५ % पदे निरसित करण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: आस्था-२०१६/प्र.क्र.२११/आस्था**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १३ जानेवारी, २०१७

वाचा- १. शासन अधिसुचना सामान्य प्रशासन विभाग क्र-शाकानि-१००६ /प्र.क्र.२३ /२००६ /१८ (र.व.का.), दि.३१ मे, २००६

२.शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय क्र.आस्थापना-२००६/ प्र.क्र-२८९/आस्था-१, दि. १४ जूलै, २००६

३.शासन निर्णय, गृह विभाग क्र-एचडीई-०१०६/प्र.क्र.५३९/आस्था-२, दि.६ नोव्हेंबर, २००६

४.शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र-पदनि-२०१०/१४/प्र.क्र.२०/आस्थापना, दि.१४जानेवारी, २०१०

५.शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र- संकीर्ण-२०११/प्र.क्र.५३६/आस्था, दि.१७ डिसेंबर, २०११

६.शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.-आस्था-२००८/प्र.क्र.३/सां.का.४, दि.७ मे, २००८

७. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.५७/२०१५/विसु-१,दि. १४/०१/२०१६

**प्रस्तावना :-**

शासन अधिसुचना सामान्य प्रशासन विभाग क्र-शाकानि-१००६ /प्र.क्र.२३ /२००६ /१८ (र.व.का.), दि.३१ मे, २००६ अन्वये गृह विभागाकडील पर्यटन उप विभाग व सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय विभागाकडील सांस्कृतिक कार्य उप विभाग एकत्रित करुन - **पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग** ॰ हा नवीन प्रशासकीय विभाग निर्माण करण्यात आला. त्या अनुषंगाने सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय विभागाने संदर्भाधिन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये इतर अधिकारी / कर्मचारी वृदांबरोबर गट -ड॰ संवर्गातील शिपायाची ३ अस्थायी पदे या विभागाकडे हस्तांतरीत केली. तदनंतर वरील संदर्भ क्र.३ येथील गृह विभागाच्या शासन निणर्याअन्वये गट ड संवगातील १ नाईक व २ शिपाई अशी ३ पदे गृह विभागाने पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाकडे हस्तांतरीत केली. तसेच संदर्भ क्र.४ अन्वये, उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने शिपायाची २ पदे व संदर्भ क्र.५ अन्वये राज्य मंत्रीमंडळाच्या मान्यतेने शिपायाचे १ पद नव्याने निर्माण करण्यात आले. दरम्यान, अल्पसंख्यांक विकास विभाग नव्याने निर्माण करण्यात आल्याने इतर कर्मचारीवृंदाबरोबर या विभागाने उपरोक्त संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये गट "ड" संवगातील १ शिपायाचे पद नवनिर्मित अल्पसंख्याक विभागाकडे हस्तांतरीत केले. अशाप्रकारे सद्य:स्थितीत विभागांतर्गत गट "ड" संवर्गात नाईक-१ पद व शिपाई-७ पदे मंजूर आहेत. उपरोक्त संदर्भ क्र.७ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयातील परिच्छेद १(५) मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागाच्या आस्थापनेवरील गट - ड संवर्गात २५ टक्के पदे निरसित करणे आवश्यक आहे. यास्तव विभागाने आता खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

या विभागाच्या आस्थापनेवर गट-ड संवर्गातील नाईक १ पद व शिपाई ७, अशी एकूण ८ पदे मंजूर आहेत. सदर पदांच्या २५% म्हणजेच २ पदे वित्त विभागाच्या वरील शासन निर्णयानुसार विभागाने निरसित करणे आवश्यक आहे. तथापि, विभागाकडील कामाची व्याप्ती व सदर संवर्गातील रिक्त असलेले १ पद विचारात घेऊन शिपाई - १ पद या शासन निर्णयाअन्वये निरसित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१७०१११३०७२९०७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aruna Navinchandra Golatkar

Digitally signed by Aruna Navinchandra Golatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7481e589f660c16d0bd187d0b3319648e8a85037c71ec87c260cbc170646b87c, cn=Aruna Navinchandra Golatkar
Date: 2017.01.13 11:36:03 +05'30'

**( अ. न. गोलटकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव
३. मा.मंत्री (सां.का.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री ( पर्यटन) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक
७. महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई-१
८. महालेखापाल-१ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र,मुंबई-१
९. अधिदान व लेखा अधिकारी (रोखशाखेमार्फत)
१०.निवासी लेखा अधिकारी, वांद्रे(पू), मुंबई-५१
११.सह सचिव (पर्यटन) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.उप सचिव, वित्तीय सुधारणा/व्यय-१४/ आकृतीबंध सुधारणा कक्ष, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.कक्ष अधिकारी (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.निवडनस्ती (आस्था)